**वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता व मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता यांच्या पदनामात बदल करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदना-२०१३/बदल/प्र.क्र.४६२/सेवा-५**
गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १०वा मजला,
मंत्रालय,मुंबई -०१
तारीख: २९ मे, २०१७

वाचा :-

१) **संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/वै.सा.का. व म.सा.का./ न.क्र.२१/टे-२/५०४३-४४/२०१३ दि. १८ मे, २०१३**

प्रस्तावना :-

वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता व मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता यांच्या पदनामात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता व मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता यांच्या पदनामात बदल करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे अधिपत्याखालील वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००) व मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००) या पदांच्या पदनामात खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

१) वैद्यकीय सामाजिक कार्यकर्ता या पदाचे सध्याचे पदनाम बदलुन ते समाजसेवा अधिक्षक (वैद्यकीय ) असे करण्यात येत आहे.

२) मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता या पदाचे सध्याचे पदनाम बदलुन ते समाजसेवा अधिक्षक (मनोविकृती) असे करण्यात येत आहे.

पदनामात वरीलप्रमाणे बदल झाल्यामुळे या पदाच्या वेतन व भत्ते तसेच कर्तव्य व जबाबदाऱ्यांमध्ये कोणताही फरक पडणार नाही.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201705291642510717 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2017.05.29 17:40:07 +05'30'

**सं.रा.मोरे**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), पुणे
४. सहसंचालक आरोग्य सेवा (हिवताप व जलजन्य रोग), पुणे
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
७. सामान्य प्रशासन विभाग, का-१२, मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग,सेवा-९/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती-सेवा-५.